**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी १५१८/प्र.क्र.१६२/१४ अ.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०३ नोव्हेंबर, २०१८

संदर्भ:- १) सा.प्र.वि. क्र.एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ, दिनांक १३-०६-२०१८ चे आदेश
२) सा.प्र.वि. क्र.एसआरव्ही २०१६/प्र.क्र.५१०/कार्या.१२, दिनांक १६-०२-२०१८ चे शासन निर्णय

## शासन आदेश

राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठात श्री.दे.ओ.चव्हाण, हे दिनांक ०१-१२-२०१५ पासून व श्री.सुरज पांगारकर हे दिनांक ०१-०२-२०१४ पासून कार्यरत आहेत. या दोन्ही कर्मचाऱ्यांची सेवा संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक १३-०६-२०१८ च्या आदेशान्वये मंत्रालयीन विभागात प्रत्यावर्तीत करण्यात आलेली आहे. सदरहू दोन्ही कर्मचाऱ्यांना संबंधित राज्य माहिती आयोग अमरावती खंडपीठ यांनी अद्याप कार्यमुक्त केलेले नाही.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, या शासन निर्णयास शा.नि. क्र. एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दिनांक १६-०२-२०१८ अन्वये दि.१७-१२-२०१६ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

क) परि.क्र ५(अ) (३) पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.:-

परि.क्र. ५(अ) (३):- प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्यात यावी व संबंधित अधिकाऱ्याची इच्छुकता व संवर्ग नियंत्रण विभागाचे सहमतीने हा कालावधी चौथ्या वर्षाकरिता वाढविण्यात यावा. परंतु चार वर्षांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर आणखी एक वर्षासाठी म्हणजेच ५ व्या वर्षासाठी मुदतवाढ द्यावयाची झाल्यास मा. मुख्यमंत्री यांची विनिर्दिष्टपणे मान्यता घेण्यात यावी. ५ वर्षाचा कालावधी संपल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत मुदतवाढ अनुज्ञेय राहणार नाही.

३. मंत्रालयीन विभागाचे संवर्ग संनियंत्रण या विभागाकडे असल्यामुळे वरील शासन निर्णयातील तरतूदीस अनुसरुन आपल्या प्रतिनियुक्तीस कोणतीही मुदतवाढ देण्यात आलेली नाही तरी देखील संबंधित राज्य माहिती आयोगाकडून आपणास वेतन व भत्ते अदा करण्यात आलेले आहेत. सबब, दिनांक १६-०२-२०१८ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार या आदेशान्वये श्री.दे.ओ.चव्हाण, सहायक कक्ष अधिकारी व श्री सुरज पांगारकर, सहायक कक्ष अधिकारी यांना दिनांक १२-११-२०१८ (म.पू.) रोजी राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ या

कार्यालयातून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. आपण अन्य इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता दिनांक १३-०६-२०१८ च्या आदेशान्वये सेवा प्रत्यावर्तीत करण्यात आलेल्या मंत्रालयीन प्रशासकीस विभागात रुजू व्हावेत.

४. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ चे नियम १२ मधील तरतुदीनुसार श्री.दे.ओ.चव्हाण, व श्री.सुरज पांगारकर, या दोन्ही सहायक कक्ष अधिकाऱ्यांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय नसल्याने, संबंधित सहायक कक्ष अधिकारी हे सेवा प्रत्यावर्तीत करण्यात आलेल्या विभागात तत्काळ रुजू झाले नाहीत तर, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी सेवाखंड धरण्यात येईल.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०५१३३७५५५९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.11.05 13:41:05 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.दे.ओ.चव्हाण व श्री.सुरज पांगारकर राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठात

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२. अ.मु.स./ प्रधान सचिव / सचिव, संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय मुंबई - ४०० ०३२. (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
३. सह / उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४. उप सचिव, राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ, विश्रामभवनाजवळ, भातकुली तहसिल परिसर, अमरावती.
५. उप सचिव (कार्यासन क्र.६), सामान्य प्रशासन विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयसमोर, मुंबई ४०० ०३२.
६. सचिव, राज्य माहिती आयोग, मुख्यालय, १३ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालयसमोर, मुंबई-४०० ०३२.
७. कोषागार अधिकारी, अमरावती , परांजपे कॉलनी, अमरावती, महाराष्ट्र ४४४६०२
८. निवडनस्ती.